राज्य शासनाकडून समुदाय संसाधन व्यक्तीं (Community Resource Person-CRP) / प्रेरिका (ICRP) / सखी यांना देण्यात येणारे वाढीव मानधन व स्वयंसहाय्यता गट यांना देण्यात येणारा वाढीव फिरता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाप्र - २०२४/प्र.क्र.९२/योजना-३**
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च,२०२५.

**वाचा :-**

१. ग्राम विकास विभागाचा शासन निर्णय, क्र.उमेद-२०२३/प्र.क्र.७३/योजना-३, दिनांक २६ सप्टेंबर, २०२३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १५ ऑक्टोंबर, २०२४.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दिनांक ०८ जानेवारी, २०२५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च,२०२५.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/ले.व वि./कार्या-०५/जा.क्र.६९२/२०२५, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

संभाजीनगर येथील दिनांक १६.०९.२०२३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत कार्यरत समुदाय संसाधन व्यक्तीं (Community Resource Person-CRP) / प्रेरिका (ICRP) / सखी यांना त्यांच्या कामाचे प्रचलित पध्दतीने मुल्यमापन करुन कमाल रु.६०००/- दरमहा मानधन अदा करण्याबाबत तसेच उमेद-महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत स्थापन झालेल्या स्वयंसहाय्यता गटांना सद्य:स्थितीत “अ”, “ब” व “क” वर्गवारीत श्रेणीकरण करुन अधिकतम रु.१५,०००/- फिरता निधी (Revolving Fund) वितरीत करण्यात येतो. यामध्ये वाढ करुन केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनान्वये स्वयंसहाय्यता गटांची वर्गवारी करुन “अ” वर्गवारी प्राप्त होणाऱ्या स्वयं सहाय्यता गटांना रु.३०,०००/- व वर्गवारी “ब” व “क” मध्ये येणाऱ्या स्वयंसहाय्यता गटांना प्रचलित पध्दतीने फिरता

निधी (Revolving Fund) अदा करण्याबाबत संदर्भाधिन क्र.१ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने या योजनेसाठी (२५०१ ए१८२) या लेखाशीर्षाखाली रु.१७२.४८२५ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून माहे फेब्रुवारी,२०२५ चे समूह संसाधन व्यक्ती/ प्रेरिका/ सखी यांचे मानधन रक्कम रु.१४,६६,२५,५००/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

सन २०२४-२५ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत समुदाय संसाधन व्यक्तींसाठी वाढीव मानधन व स्वंय सहायता गटांना फिरता निधी (अतिरिक्त राज्य हिस्सा) (२५०१ए१८२) याकरिता केलेल्या तरतूदीतून रक्कम रु.१४,६६,२५,५००/- (रुपये चौदा कोटी सहासष्ट लक्ष पंचवीस हजार पाचशे फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.१४,६६,२५,५००/- (रुपये चौदा कोटी सहासष्ट लक्ष पंचवीस हजार पाचशे फक्त) चा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१)(२१) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत समुदाय संसाधन व्यक्तींसाठी वाढीव मानधन व स्वंय सहायता गटांना फिरता निधी (अतिरिक्त राज्य हिस्सा), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ ए१८२)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन आदेशान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभागयांचेकडे पाठवावी. १) मंजूर

केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर शासन आदेश वित्त विभाग परिपत्रक्र परिपत्रक दिनांक २५.०७.२०२४, १५.१०.२०२४, ०८.०१.२०२५ व दिनांक १७.०३.२०२५ अन्वये तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१९७/२०२५/व्यय-१५, दिनांक २०.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१७३२४२७२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2025.03.28 17:47:07 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्तविभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवड नस्ती.